**प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) अंतर्गत राज्यात नवीन अंगणवाडी केंद्र सुरू मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.३७७/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ५ मार्च,२०२४

**संदर्भ:-** १) केंद्र शासनाचे पत्र क्र. ११/१३/२०२३-CD-I दिनांक १४.१२.२०२३
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र दि. १९.१२.२०२३ व दि. ०५.०१.२०२४
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.११/१३/२०२३- CD-I दिनांक ०५.०१.२०२४
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.११/१३/२०२३- CD-I दिनांक १२.०१.२०२४
५) केंद्र शासनाचे पत्र क्र.११/१३/२०२३- CD-I दिनांक १९.०१.२०२४
६) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या दिनांक २२.०२.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) अंतर्गत देशामध्ये PVTG Habitation (Particularly Vulnerable Tribal Group) क्षेत्रामध्ये नवीन अंगणवाडी केंद्र सुरू करण्याबाबत केंद्र शासनाने दि. १४.१२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये कळविलेले आहे. त्यानुषंगाने सदर अंगणवाडी केंद्रांकरिता आवर्ती स्वरूपाचा खर्च (मानधन, प्रशासकीय खर्च, पोषण आहार, अंगणवाडी भाडे, गणवेश इत्यादी) हा सक्षम अंगणवाडी व पोषण २.० अंतर्गत केंद्र व राज्य हिश्याकरिता विहित केलेल्या प्रमाणानुसार करण्याबाबत केंद्र शासनाने कळविलेले आहे. तसेच PM JANMAN या कार्यक्रमांतर्गत अंगणवाडी बांधकामाकरिता केंद्र शासनाकडून प्रति अंगणवाडी बांधकाम रुपये १२.०० लक्ष प्रमाणे १०० टक्के निधी केंद्र हिश्यातून उपलब्ध करण्यात येईल असे देखील केंद्र शासनाने सदर पत्रान्वये कळविलेले आहे.

२. केंद्र शासनाच्या सूचना विचारात घेऊन एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालयाकडून संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरून केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. १२.०१.२०२४ रोजीच्या आदेशान्वये राज्यात प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) अंतर्गत ७० नवीन अंगणवाडी केंद्र सुरू करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने दिलेल्या मान्यतेनुसार राज्यात प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) अंतर्गत ७० नवीन अंगणवाडी केंद्र सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) अंतर्गत राज्यातील PVTG Habitation (Particularly Vulnerable Tribal Group) क्षेत्रामध्ये राज्यात ७० नवीन अंगणवाडी केंद्र सुरू करण्यास व त्यानुषंगाने येणाऱ्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२.	वरीलप्रमाणे मान्यता देण्यात आलेली अंगणवाडी केंद्र नियोजित ठिकाणी कार्यान्वित करण्याची कार्यवाही आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी तात्काळ करावी. त्यानुषंगाने या अंगणवाडी केंद्रांकरिता विविध घटकांच्या बाबतीत खालील निकषांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

**१) मानधन:-**

प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) अंतर्गत राज्यातील PVTG Habitation (Particularly Vulnerable Tribal Group) क्षेत्रामध्ये ७० नवीन अंगणवाडी केंद्र सुरू केल्यामुळे या प्रत्येक अंगणवाडी केंद्राकरिता अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस यांची प्रत्येकी १ प्रमाणे पदभरती करण्याची कार्यवाही प्रचलित नियमानुसार करण्यात यावी. त्यानुषंगाने या अंगणवाडी कर्मचा-यांच्या मानधनाकरिता येणारा खर्च प्रचलित कार्यपद्धती विचारात घेऊन केंद्र हिस्सा त्यास समरुप राज्य हिस्सा व अतिरिक्त राज्य हिश्याच्या संबंधित लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

**२) इतर बाबी:-**

प्रस्तुत ७० अंगणवाडी केंद्रांकरिता पूरक पोषण आहार, प्रशासकिय खर्च, गणवेश/ साडी, अंगणवाडी भाडे, PSE Kit, Medicine Kit इत्यादी बाबींकरिता केंद्र शासनाने विहित केलेले केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण विचारात घेऊन प्रचलित कार्यपध्दतीनुसार येणारा खर्च संबंधित लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

**३) अंगणवाडी बांधकाम:-**

PM JANMAN अंतर्गत अंगणवाडी बांधकाम करण्याकरिता प्रति अंगणवाडी रुपये १२ लक्ष प्रमाणे १०० टक्के निधी केंद्र हिश्यामधून उपलब्ध होणार असल्याने त्यानुषंगाने लेखाशीर्ष कार्यान्वित करण्यात येत असून केंद्र हिश्याची तरतूद प्राप्त झाल्यानंतर त्याप्रमाणे तरतूद संबंधित लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येईल. सदर तरतुदीमधून केंद्र शासनाने दिलेल्या सूचना विचारात घेऊन त्याप्रमाणे अंगणवाडी बांधकाम विषयक कार्यवाही करून त्याप्रमाणे खर्च भागविण्यात यावा.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०५११३४०५६९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A08441 01C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR Date: 2024.03.05 14:10:15 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा.उपमुख्यमंत्री(वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,

१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

११) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२) सर्व जिल्हाधिकारी,

१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१४) सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास),

१५) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद,

१६) सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी,

१७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प,

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,

२१) निवड नस्ती -का-६.